**वन विभागांतर्गत प्रशिक्षण संस्थांमधील शिक्षकी पदांवरील अधिकारी / कर्मचारी यांना प्रोत्साहन म्हणून ३० टक्के प्रशिक्षण भत्ता मंजूर करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : एफडीएम-२०१५/प्र.क्र.१४८/फ-२**
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा रोड,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,
दिनांक :- ३१ डिसेंबर, २०१६

**वाचा :-** सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्र.टीआरएन-०९/प्र.क्र.३९/०९/१३-अ, दि.२३.०९.२०११

**प्रस्तावना :-**

महाराष्ट्र राज्यात वन विभागातील विविध पदावरील अधिकारी व कर्मचारी यांना वन विभागाचे नियमित व उजळणी प्रशिक्षण देणेकरीता कुंडल, चंद्रपूर, चिखलदरा, शहापूर, पाल व जालना येथे वन खात्याची एकूण सहा प्रशिक्षण केंद्रे अस्तित्वात आहेत. सदर प्रशिक्षण केंद्रे ही दुर्गम, अतिदुर्गम व जंगलयुक्त भागात आहेत. तेथे दळणवळणाची साधने अत्यंत अपूरी असल्यामुळे सदर प्रशिक्षण केंद्रांमध्ये अधिकारी / कर्मचारी जाण्यास फारसे इच्छुक नसतात. त्यामुळे प्रशिक्षण विद्यालये / महाविद्यालये / ॲकॅडमीमधील पदे रिक्त राहतात अथवा तेथे सुयोग्य व्याख्याते मिळत नसल्यामुळे प्रशिक्षणाचा दर्जा उंचावणे कठीण होते.

उपरोक्त बाबींचा सर्वंकष विचार करता, वन विभागांतर्गत देण्यात येणाऱ्या प्रशिक्षणाचा दर्जा उंचावण्यासाठी, रिक्त पदे भरण्यासाठी व वन विभागातील चांगल्या दर्जाच्या अधिकाऱ्यांची सदर संस्थांमध्ये नेमणूक होण्याकरिता, त्यांना चांगल्या सोई-सुविधा आणि आकर्षक वेतनश्रेणी देणे गरजेचे आहे.

या सर्व बाबींचा विचार करुन सामान्य प्रशासन विभागाने दि.२३.०९.२०११ रोजीच्या शासन निर्णयान्वये महाराष्ट्र राज्याचे प्रशिक्षण धोरण ठरविले आहे. सदर प्रशिक्षण धोरणामधील परिच्छेद क्र.५.२ मध्ये प्रशिक्षण संस्थेकडे प्रतिनियुक्तीने येणाऱ्या प्रशिक्षकांसाठी मूळ वेतनाच्या ३० % प्रशिक्षण भत्ता अनुज्ञेय राहील, मात्र प्रतिनियुक्ती भत्ता अनुज्ञेय राहणार नाही असे नमूद केले आहे. त्यानुसार, वन विभागातील प्रशिक्षण संस्थांमध्ये प्रतिनियुक्तीने / बदलीने येणाऱ्या प्रशिक्षकांसाठी मूळ वेतनाच्या ३० % प्रशिक्षण भत्ता अनुज्ञेय करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

सामान्य प्रशासन विभागाच्या दि.२३.०९.२०११ रोजीच्या शासन निर्णयान्वये निर्गमित केलेल्या महाराष्ट्र राज्याच्या प्रशिक्षण धोरणामधील परिच्छेद क्र.५.२ मध्ये नमूद केल्याप्रमाणे वन विभागातील प्रशिक्षण संस्था / विद्यालय / महाविद्यालय / अकॅडमीमधील प्रशिक्षकांना प्रोत्साहन देण्याच्या दृष्टीकोनातून ते त्या संस्थेमध्ये प्रशिक्षणार्थ्यांना प्रशिक्षण देण्यास्तव प्रतिनियुक्तीने / बदलीने रुजू झाल्यापासून तेथे कार्यरत असेपर्यंत त्यांच्या मूळ वेतनाच्या (मूळ वेतन + ग्रेड वेतन) ३० टक्के प्रशिक्षण भत्ता देण्यास शासन मान्यता देत आहे. मात्र त्यांना प्रतिनियुक्ती भत्ता अनुज्ञेय राहणार नाही.

वन विभागामधील प्रशिक्षण संस्थांमध्ये जे अधिकारी / कर्मचारी हे प्रतिनियुक्तीने / बदलीने शिक्षकी पदावर कार्यरत असतील त्यांना ३० टक्के प्रशिक्षण भत्ता देय ठरेल. तसेच या संस्थांमधील जी पदे अशिक्षकी स्वरुपाची आहेत, त्यांना ३० % प्रशिक्षण भत्ता देय होणार नाही. सदर शासन निर्णय निर्गमित झाल्याच्या दिनांकापासून अंमलात येईल.

सदर शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभागाचा अनौपचारीक संदर्भ क्र.०९/२०१६/१२-अ, दि.०३.१२.२०१६ अन्वये दिलेल्या सहमतीनुसार आणि त्या विभागाच्या दि.२३.०९.२०११ रोजीच्या शासन निर्णयामधील तरतूदीस अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०१०४१६२७१२४११९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

Dattatray Laxman Thorat

Digitally signed by Dattatray Laxman Thorat
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Revenue And Forest Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=e99493394e30f531116ee97373b411b529e251aecc25fd9c455defa0031292a7, cn=Dattatray Laxman Thorat
Date: 2017.01.04 16:30:16 +05'30'

**( डि.एल.थोरात )**
सह सचिव, महसूल व वन विभाग

**प्रति :-** १) मा.मंत्री (वने) यांचे खाजगी सचिव
२) मा.राज्यमंत्री (वने), यांचे खाजगी सचिव
३) प्रधान मुख्य वनसंरक्षक (वनबल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
४) प्रधान मुख्य वनसंरक्षक (संशोधन, शिक्षण व प्रशिक्षण), पुणे
५) सर्व प्रधान मुख्य वनसंरक्षक
६) अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
७) अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक सर्व
८) संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई
९) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/ लेखा परीक्षा), १/२ महाराष्ट्र राज्य, मुंबई/नागपूर.
१०) सह सचिव / उप सचिव, वित्त विभाग (अर्थ-३) / (व्यय-१०), मंत्रालय, मुंबई-३२.
११) महासंचालक, कुंडल विकास, प्रशासन व व्यवस्थापन प्रबोधिनी (वने), कुंडल
१२) संचालक, चंद्रपूर वन विकास, प्रशासन व व्यवस्थापन प्रबोधिनी (वने), चंद्रपूर
१३) मुख्य वनसंरक्षक (शिक्षण व प्रशिक्षण), पुणे
१४) मुख्य वनसंरक्षक सर्व, / वनसंरक्षक सर्व
१५) सर्व जिल्हा कोषागार अधिकारी
१६) उप सचिव, नियोजन विभाग (१४७५) /(१४११), मंत्रालय, मुंबई-३२.
१७) उप सचिव, सामान्य प्रशासन विभाग (१२-अ), मंत्रालय, मुंबई-३२.
१८) महाराष्ट्र वनराजिक महाविद्यालय, चिखलदरा, जि.अमरावती
१९) वनरक्षक प्रशिक्षण विद्यालय, शहापूर, जि.ठाणे
२०) दादासाहेब चौधरी वन प्रशिक्षण विद्यालय, पाल, जि.जळगांव
२१) वनरक्षक प्रशिक्षण विद्यालय, जालना, जि.जालना
२२) ब-१ कार्यासन, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
२३) निवडनस्ती, फ-२ कार्यासन, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.